**कक्ष अधिकारी पदावरुन अवर सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : असप-१३१८/प्र.क्र.१५१/का.१४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २८.१२.२०१८

**<u>आदेश</u>**

खालील कक्ष अधिकाऱ्यांना या आदेशाच्या दिनांकापासून अवर सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | कक्ष अधिकाऱ्यांचे नाव | जात प्रवर्ग | सध्याचा विभाग | अवर सचिव पदावरील पदोन्नतीनतरचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. र.ई गिरी | भज(ब) | कृषि व पदुम विभाग | ग्रामविकास विभाग |
| २ | श्रीमती शै.सं.शिरोडकर | इमाव | नगर विकास विभाग | वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग |
| ३ | श्रीमती ज.र.गणेकर | खुला | वित्त विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ४ | श्री. हे.द.भांगले | खुला | नियोजन विभाग | नियोजन विभाग |
| ५ | श्री. दि.पा.डोळस | खुला | वित्त विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ६ | श्री. मि.द.सराफ | खुला | शालेय शिक्षण व क्रिडा विभाग | अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग |

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.४.८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या विरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. याबाबत विधी व न्याय विभागाने दि.२८.१२.२०१७ रोजी दिलेल्या अभिप्रायानुसार खुल्या प्रवर्गातील कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यास कोणतीही वैधानिक अडचण नसल्याचे अभिप्राय दिले आहेत. त्यानुसार तूर्तास पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत. अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीमधील मागासवर्गीय अधिकारी/ कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दि.२५.०५.२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी अशा सूचना सा.प्र.वि./का.१६-ब ने दि.२९.१२.२०१७ च्या पत्रान्वये दिल्या आहेत.

त्यानुसार सदर अधिकाऱ्यांची अवर सचिव पदावरील तदर्थ पदोन्नती मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन असून पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात देण्यात येत आहे. तसेच खालील अटीच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे:-

१) सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून तात्पुरत्या स्वरुपातील तदर्थ पदोन्नती राहील.

२) या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३) सदर अधिकाऱ्यांची अवर सचिव पदावरील तदर्थ पदोन्नती सदर अधिकाऱ्यांविरुध्द आदेशाच्या दिनांकापर्यत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४) मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील रिट पिटीशन क्र.२९८२/२०००, क्र.२९८६/२०००, ४९५८/२००३ व क्र.३३७४/२०११ मा.न्यायालयाने दि.०६.०८.२०१८ रोजी निकाली काढल्या असून मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार दि.०१.०१.१९८६ पासूनच्या कक्ष अधिकारी संवर्गाच्या ज्येष्ठतासूच्या पुनर्विलोकीत करण्यात येत आहेत. सदर पदोन्नती ही सुधारीत ज्येष्ठतासुचीच्या अधीन राहून देण्यात येत आहे. मा.न्यायालयाने दिलेल्या या निर्णयानुसार निवडसूच्या / ज्येष्ठता सूच्या, या आदेशान्वये पदोन्नत होणाऱ्या अधिकाऱ्यांचे ज्येष्ठतासूचीतील स्थान खाली जाणे अथवा पदानवत होणे या बाबी उद्भवू शकतात याचीही नोंद पदोन्नत अधिकाऱ्यांनी घ्यावी. मा. उच्च न्यायालयाच्या दि.६.८.२०१८ रोजीच्या आदेशाविरूध्द मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २५१८१/२०१८ दाखल झाली आहे. सदर पदोन्नती मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल झालेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २५१८१/२०१८ च्या अंतिम निकालास अनुसरुन राहील.

५) सदर आदेशातील पदोन्नत्याबाबत मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल विशेष अनुज्ञा याचिका क्र.२५१८१/२०१८ मध्ये अनुमती (Leave) अर्ज दाखल करण्यात येत असून मा.सर्वोच्च न्यायालयाने सदर परवानगी नाकारली तर या अधिकाऱ्यांच्या पदोन्नत्या रद्द करण्यात येवून त्यांना त्यांच्या मूळ पदावर पदावनत करण्यात येईल.

६) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी अवर सचिव संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्यांला पदावनत करण्याच्या अधीन सदर तदर्थ पदोन्नत्या देण्यात येत आहेत.

७) मागास प्रवर्गातील अधिकाऱ्यांची पदोन्नती सदर अधिकाऱ्यांचे जातवैधता प्रमाणपत्र संबंधित जातपडताळणी समितीने निर्गमित केले आहे या अटीच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

८) सदर आदेशामधील श्री.र.ई.गिरी (ज्ये.क्र.५८अ अ.क्र.१) यांचे वयाच्या ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकनाचे आदेश संबंधित विभागाने तत्काळ सामान्य प्रशासन विभागास सादर करावेत या अटीच्या अधीन राहून तदर्थ पदोन्नती करण्यात येत आहे.

३. सदर अवर सचिव पदावरील तदर्थ पदोन्नती मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र.५३६/२०१७ व क्र.४८८/२०१७ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४. हे आदेश तत्काळ अंमलात येतील. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याला संबंधित विभागाने तत्काळ कार्यमुक्त करून या विभागास कळवावे. तसेच पदोन्नत अधिकाऱ्याने पदस्थापना केलेल्या विभागात तत्काळ रूजू व्हावे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२२८१७५५३३७७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.12.28 18:35:38 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२) मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु.स.
३) अ.मु.स (सेवा), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई
४) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
५) अ.मु.स./प्रधान सचिव/ सचिव - सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग
६) सह/उप सचिव (आस्थापना) - सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग
७) संबंधित अधिकारी , विभागामार्फत
८) निवड नस्ती कार्या.१४